नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी
अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी
वितरणाबाबत. (सन २०१४-१५)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१५/प्र.क्र.७३६/नापु- १६-ब**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९ मार्च, २०१५.

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१२/१०२४/प्र.क्र.२३२/नापु १६-ब, दि. २ जानेवारी,२०१३.
२) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-२०१३/प्र.क्र.३५७/नापु १६-ब, दि. ५ जुलै,२०१३.
३) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१३/प्र.क्र.३४२/नापु १६-ब, दि. ५ जुलै,२०१३.
४) शासन निर्णय क्रमांकःगोदाबां-२०१२/१३७८/प्र.क्र.१५४भाग-१/नापु१६ब,दि.५ ऑगस्ट,२०१३.
५) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१३/प्र.क्र.४३७/नापु १६-ब, दि. २० मे,२०१३.
६) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१३/प्र.क्र.४३७/नापु १६-ब, दि. ०५ फेब्रुवारी,२०१४.
७) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१४/प्र.क्र.७३६/नापु १६-ब, दि. २५ ऑगस्ट,२०१४.

प्रस्तावना

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरित करावयाच्या धान्याच्या साठवणूकीसाठी पुरेशी गोदाम बांधण्याचा कार्यक्रम शासनाने हाती घेतला आहे. त्याअंतर्गत संदर्भीय शासन निर्णय दिनांक २५ ऑगस्ट,२०१४ अन्वये एकूण ९८ ठिकाणच्या गोदाम बांधकामांना एकूण रू. ३५६२.५० लक्ष निधी उपलब्ध करुन दिला आहे. जिल्हा पुरवठा अधिकारी चंद्रपूर, गोंदिया व अहमदनगर यांनी या गोदाम बांधकामापैकी काही गोदाम बांधकामांना वितरित केलेला निधी त्याच जिल्हयातील प्रगतीपथावर असलेल्या अन्य गोदाम बांधकामास वर्ग करण्याचे प्रस्तावित केले आहे. त्याअनुषंगाने गोदाम बांधकामासाठी उपलब्ध व वितरित अनुदान विचारात घेऊन पोंभुर्णा व गोंडपिंपरी, जि. चंद्रपूर, नवेगांव, जि. गोंदिया,जामखेड, जि. अहमदनगर येथील गोदाम बांधकामांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

प्रशासकीय मान्यतेसंदर्भातील संबंधित शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून खालीलप्रमाणे काही गोदामासाठीचा निधी अन्य गोदाम बांधकामास उपलब्ध करुन देण्यात येत आहे :-

अ) ब्रम्हपूरी, नागभिड,सिंदेवाही जि. चंद्रपूर येथील गोदाम बांधकामासाठी दिनांक २५.८.२०१४ रोजीच्या संदर्भीय शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी प्रत्येकी रू. २५,००,०००/-अशारितीने एकूण रू.७५,००,०००/- रक्कम काढून घेण्यात यावी. सदर निधी चंद्रपूर जिल्हयातील पोंभुर्णा व गोंडपिंपरी येथील गोदाम बांधकामासाठी उपलब्ध करण्यात यावा.

आ) सौंदड जि. गोंदिया येथील गोदाम बांधकामासाठी दिनांक २५.८.२०१४ रोजीच्या संदर्भीय शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या रू. ५२,२३,९९५/-निधीपैकी रू. ४५,८६,३३८/- रक्कम काढून घेण्यात यावी. सदर निधी गोंदिया जिल्हयातील नवेगाव येथील गोदाम बांधकामासाठी उपलब्ध करण्यात यावा.

इ) अकोले,जि. अहमदनगर येथील गोदाम बांधकामासाठी दिनांक २५.८.२०१४ रोजीच्या संदर्भीय शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेला रू. ४४,९५,२२१/- रक्कम काढून घेण्यात यावी. सदर निधी अहमदनगर जिल्हयातील जामखेड येथील गोदाम बांधकामासाठी उपलब्ध करण्यात यावा.

संबधित जिल्हाधिकारी यांनी वरीलप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबधित कार्यालयास निधी वर्ग करण्याबाबतची कार्यवाही तातडीने पुर्ण करावी.

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे ठिकाण | क्षमता (मे.टन) | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती मान्य अंदाजित खर्च (रु.) | यापूर्वी उपलब्ध करून दिलेला निधी रू. | सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | चंद्रपूर | पोंभुर्णा | पोंभुर्णा | १०८० | २,१४,१३,९७४ | ६४,२४,१९२ | ३७५०००० |
| २ | चंद्रपूर | गोंडपिंपरी | गोंडपिंपरी | १०८० | १,६७,१५,२४१ | ३३,४३,०४८ | ३७५०००० |
| ३ | गोंदिया | नवेगाव | नवेगाव | १०८० | १,३०,५०,७३२ | २६,१०,१४६ | ४५८६३३८ |
| ४ | अहमदनगर | जामखेड | जामखेड | १८०० | १,२६,९४,४११ | ६३,४७,२०६ | ४४९५२२१ |
| | | | | | | | १६५८१५५९ |
| | | एकूण रुपये एक कोटी पासष्ट लक्ष एक्याऐंशी हजार पाचशे एकोणसाठ फक्त | | | | | |

उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम ४ मुख्यलेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्य़क्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१)(०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल) योजनेंतर्गत (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत व सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा

वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करून दिलेल्या शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने करण्यात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम बांधकाम सुरू झाल्यानंतर प्रथम बांधकामाचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित बांधकामाचा दरमहा आढावा घेऊन बांधकामाची प्रगती, जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

बांधकामास विलंब अथवा इतर कारणानी गोदाम बांधकामास वाढीव खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधीत अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वतः भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरीक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

सदरचे आदेश प्राप्त होताच सदरील तरतुद जिल्हाधिकाऱ्यांमार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात यावी. धनादेशाने आहरीत करण्यात येऊ नये.

सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११२२२२७५२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pranali Pratap Chavan

Digitally signed by Pranali Pratap Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies & Consumer Protection, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pranali Pratap Chavan
Date: 2015.03.11 12:32:56 +05'30'

**( प्र.प्र.चव्हाण )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपआयुक्त (पुरवठा), नाशिक, नागपूर.
२. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर, अहमदनगर व गोंदिया.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, नाशिक, नागपूर.
५. कार्यकारी अभियंता, चंद्रपूर, अहमदनगर व गोंदिया.
६. जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर, अहमदनगर व गोंदिया.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर, अहमदनगर व गोंदिया.
८. महालेखापाल-१/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचेमार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-४, अर्थबळ, अर्थोपाय व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१२. उपमहाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजी नगर, पुणे-५.
१३. निवडनस्ती, नापु १६-ब.

******************